**एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमातून नगर पालिका/ नगर परिषद, मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब संवर्ग वगळण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन- ०७१८/प्र.क्र.३७/सीपीटीपी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १३ ऑगस्ट, २०१८.

**वाचा :**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि २०.१.२०१४.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-०२१६/प्र.क्र.५८/ सीपीटीपी,दि. ४.०१.२०१७
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-०५१७/प्र.क्र.३६/सीपीटीपी, दि २१.०७.२०१७

**प्रस्तावनाः-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे शासनसेवेत नियुक्त होणा-या अधिकाऱ्यांना एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत दोन वर्षांचे प्रशिक्षण देण्याचा धोरणात्मक निर्णय शासनाने उपरोक्त वाचा येथील अनुक्रमांक १ द्वारे निर्देशित शासन निर्णयान्वये घेतला आहे. सदर शासन निर्णयामधील तरतूदींना अनुसरुन उक्त प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये नगर विकास विभागाच्या अखत्यारीतील नगर पालिका/ नगर परिषद, मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब या संवर्गातील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या राज्यसेवा परीक्षेच्या अंतिम निकालाच्या आधारे शिफारसप्राप्त उमेदवारांना प्रशिक्षण देण्यात येते. उपरोक्त वाचा येथील अनुक्रमांक २ येथे निर्देशित शासन निर्णयान्वये एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत आयोजित करावयाच्या दोन वर्षाच्या प्रशिक्षणाचे विविध टप्पे व त्यांचा कालावधी निर्धारित केला आहे.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत, राज्यसेवा परीक्षा-२०१७ च्या निकालान्वये, नगर पालिका/ नगर परिषद, मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब या संवर्गासाठी निवड झालेल्या उमेदवारांना एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत केवळ सहा आठवड्यांचे पायाभूत प्रशिक्षण देवून त्यानंतर या उमेदवारांना उक्त प्रशिक्षण कार्यक्रमातून वगळण्याबाबत व त्यांना नगर विकास विभागामार्फत “On Feild Training” स्वरुपात नियुक्ती देण्याबाबतचा प्रस्ताव नगर विकास विभागाकडून प्राप्त झाला होता.

३. एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत सद्यःस्थितीत एकूण २४ संवर्गांना प्रशिक्षण देण्यात येते. या सर्व संवर्गातील परिवीक्षाधीन अधिका-यांना एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण पूर्ण करणे तसेच उपरोक्त वाचा येथील अनुक्रमांक ३ येथे निर्देशित शासन निर्णयामधील तरतूदींनुसार पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम पूर्ण करणे बंधनकारक आहे. नगर विकास विभागाने प्रस्तावित केल्यानुसार नगर पालिका/ नगर परिषद, मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब या संवर्गातील उमेदवारांना “On Feild Training” स्वरुपात नियुक्ती दिल्यामुळे या संवर्गासाठी प्रशिक्षण / पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम हा, प्रशिक्षण कार्यक्रमाचे विहीत नियम व वेळापत्रकानुसार पूर्ण होऊ शकणार नाही. त्याचप्रमाणे या प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये समाविष्ट सर्व संवर्गातील परिवीक्षाधीन अधिका-यांना २ वर्षांचा प्रशिक्षण कार्यक्रम पूर्ण

झाल्यानंतर नियुक्ती देण्यात येते. त्यामुळे नगर पालिका/ नगर परिषद, मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब या संवर्गातील उमेदवारांना “On Feild Training” स्वरुपात नियुक्ती दिल्यामुळे या संवर्गातील उमेदवार व प्रशिक्षण कार्यक्रमातील अन्य संवर्गातील उमेदवार यांना नियुक्ती देण्याबाबत विसंगती निर्माण होण्याची शक्यता विचारात घेऊन वरील प्रस्तावाच्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत सर्व संवर्गांना एकसमान पद्धतीचे प्रशिक्षण देण्याचे शासनाचे धोरण असल्यामुळे नगर विकास विभागाच्या अधिपत्याखालील नगर पालिका/ नगर परिषद, मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब या संवर्गांच्या प्रशिक्षणासंदर्भात शासनाकडून पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

१. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेमधून नगर पालिका/ नगर परिषद, मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब या संवर्गातील पदांवर निवड झालेल्या उमेदवारांना यापुढे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाच्या प्रशिक्षणातून वगळण्यात येत आहे.
२. त्यामुळे महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेमधून नगर पालिका/ नगर परिषद, मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब या संवर्गातील पदांवर निवड झालेल्या उमेदवारांना, यापुढे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये प्रशिक्षण घेणा-या उमेदवारांसाठी विविध शासन निर्णय, परिपत्रके, अधिसूचना इ. द्वारे निर्धारीत करण्यात आलेल्या तरतूदी लागू राहणार नाहीत.
३. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेमधून नगर पालिका/ नगर परिषद, मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब या संवर्गातील नियुक्ती साठी या संवर्गाची मागणीपत्रे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे पाठविण्यापासून त्यांना नियुक्ती देणे, त्यांचे प्रशिक्षण आयोजित करणे व इतर अनुषंगिक बाबींवरील कार्यवाही या संवर्गाशी संबंधित प्रशासकीय विभाग म्हणून नगर विकास विभागामार्फत करण्यात येईल
४. सदर तरतूदी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षा-२०१७ च्या अंतिम निकालाद्वारे तसेच यापुढील परीक्षांद्वारे नगर पालिका/ नगर परिषद, मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब या संवर्गांसाठी निवड झालेल्या उमेदवारांना लागू राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८१८१५५०४७७९०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sitaram Janardan Kunte
Date: 2018.08.18 15:56:09 +05'30'

**( सीताराम कुंटे )**
**अपर मुख्य सचिव (सेवा)**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,

२. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,
३. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (महसूल/ गृह/ ग्राम विकास/ वित्त/ सहकार/ नगर विकास/ राज्य उत्पादन शुल्क/ परिवहन/ सामान्य प्रशासन/ शालेय शिक्षण).
४. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधीनी (यशदा), राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
६. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), नागपूर,
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे),
८. निवडनस्ती कार्यासन - सीपीटीपी.